अकृषि विद्यापीठे तसेच अशासकीय अनुदानीत / विना अनुदानीत महा-विद्यालयांतील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या धारणाधिकाराबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय: संकिर्ण -२०२५/ ई ८४६७३५ /विशि-१,**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- ५ मार्च,२०२५

वाचा:-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचा शासन निर्णय क्रमांक नियुक्ती-२०१०/ (प्र.क्र.३३७/ २०१०)/ म.शि.५, दिनांक २३ ऑगस्ट,२०१०.
२) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण -२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दिनांक ८ मार्च,२०१९.
३) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्रमांक युएनआय/ई २५१६५१६/विशि-१, दिनांक २३ डिसेंबर,२०२४.

**प्रस्तावना:-**

अकृषि विद्यापीठे, अनुदानीत / विना अनुदानीत महाविद्यालयांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या धारणाधिकाराबाबत एकसुत्रता असावी तसेच, धारणाधिकाराच्या कालावधीत धारणाधिकार प्राप्त कर्मचाऱ्यांच्या पदावर कोणत्या स्वरुपात नियुक्ती करावी. या संदर्भातील सूचना उपरोक्त दिनांक २३ ऑगस्ट,२०१० च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक (३) नुसार, अधिकतम दोन वर्षासाठी धारणाधिकार मंजूर करता येतो. तसेच,विद्यापीठ कायद्यातील वैधानिक पदावर नियुक्ती झाल्यास, अधिकतम ५ वर्षासाठी धारणाधिकार मंजूर करण्यात येतो.उपरोक्त वैधानिक पदावर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांचा नियत वयोमानाने सेवानिवृत्त होण्याचा सेवा कालावधी ५ वर्षांपेक्षा अधिक असल्यास, त्यांच्या धारणाधिकाराबाबत समस्या निर्माण होऊ शकते. त्यामुळे धारणाधिकाराच्या कालमर्यादेत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अकृषि विद्यापीठे, अनुदानीत / विना अनुदानीत महाविद्यालयांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची, विद्यापीठ कायद्यातील वैधानिक पदावर नियुक्ती झाल्यास, त्यांना दिनांक २३ ऑगस्ट,२०१० च्या शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक (३) अन्वये, ५ वर्षे इतक्या कालावधीसाठी धारणाधिकार मंजूर करण्यात येतो. त्यात सुधारणा करुन सदर धारणाधिकाराचा कालावधी १० वर्षे इतका करण्यात येत आहे.

०२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०५११३०१४८३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.03.05 11:31:33 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व सह सचिव / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व विभागीय सहसंचालक, उच्चशिक्षण,
११. सर्व कुलसचिव, सार्वजनिक विद्यापीठे.
१२. कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ नाशिक.
१३. कुलसचिव, कवि कुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
१४. सर्व कुलसचिव, राज्य अभिमत विद्यापीठे.
१५. सर्व कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठे,
१६. सर्व कुलसचिव, राज्य समूह विद्यापीठे.
१७. सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. अवर सचिव (मशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती.